(२१५) 20150422170908042 7

**ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक येथील वावीहर्ष उपसा सिंचन योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : उसिंयो २००८/३३२/(१२१/२००८) खारभूमी

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ७ /६/२००८

**पहावे :-** १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश मुंबई यांचे दिनांक ६.०३.२००८ चे पत्र क्र २००८/वावीहर्ष उसिंयो/तां-४/१५४१.

**प्रस्तावना :-**

वावीहर्ष आदिवासी उपसा सिंचन योजना ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक या योजनेस शासन निर्णय क्र. जसंवि,उसिंयो २००४/४७३/(१५८/२००४) खारभूमी दिनांक १६.३.२००५ अन्वये रू. २२८.३४ लक्ष रक्कमेस मुळ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. या योजनेचे काम माहे फेब्रवारी २००६ मध्ये सुरू करण्यात आले. योजनेचे काम जवळजवळ पूर्ण झाले आहे. सर्व विद्युत पंप, पाईप लाईनची चाचणी घेण्यात आली असून, सन २००७-०८ मधील रब्बी हंगामापासून सर्व क्षेत्रात पाणी उपलब्ध करून देण्यात आले आहे. त्याचप्रमाणे दरसूचीतील दरातील वाढ, संकल्पचित्रातील बदल, कामाच्या परिमाणातील वाढ तसेच इतर कारणांमुळे व अनुषंगिक खर्चातील वाढीमुळे योजनेच्या किंमतीत वाढ होत आहे. त्यामुळे सन २००७-०८ ची दरसूची आधारून योजनेचे सुधारित अंदाजपत्रक तयार करून रू. ३२८.१६ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंबंधात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये वावीहर्ष आदिवासी उपसा सिंचन योजना ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित खर्च रुपये ३,२८,१५,८७७/- (रुपये तीन कोटी, अठ्ठावीस लक्ष, पंधरा हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त) यापैकी रुपये २,६२,००,३०१/- कामाप्रित्यर्थ व रुपये ६६,१५,५७६/- अनुषंगिक खर्च या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात आलेला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय- ३ "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च (१) सर्वसाधारण लघु पाटबधारे योजना (१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. प्रत्यक्ष निधी उपलब्ध झाल्यानंतरच या योजनेवर खर्च करण्यात यावा.

A:\476.doc
A:\476.doc

हा शासन निर्णय, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०९९/(१२६/९९) भोप्र (प्र) दिनांक १८.५.१९९९ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (१२/२००८) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( रा.च.हुमणे )**
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, कळवा, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
उप अभियंता (श्री पाटील), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, नाशिक
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

A:\476.doc

(दिनांक ७ /६/२००८ चा शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र उसिंयो
२००८/३३२/(१२१/२००८) खारभूमी चे सहपत्र)

## विवरणपत्र

## परिशिष्ट वावी हर्ष आदिवासी उपसा सिंचन योजना ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक

### अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | भाग-१ | कामाची सुधारित किंमत (रूपये) | |
|---|---|---|---|
| | | अंदाजित किंमत | एकूण किंमत |
| १. | प्राथमिक सर्व्हे | --- | --- |
| २. | पोहोच कालवा | --- | ७,०१,६१२ |
| ३. | जॅकवेल व पंपहाऊस | --- | २८,११,५१७ |
| ४. | पोहोच रस्त्याचा भराव | --- | ७,०२,५२५ |
| ५. | रायझिंग मेन | --- | १,०४,१७,०१३ |
| ६. | डिलीव्हरी चेंम्बर्स | --- | १५,१७,६७७ |
| ७. | वितरण प्रणाली | --- | ५३,२७,२२१ |
| | **एकूण** | | २,१५,७३,७३३ |
| | **भाग-२** | | |
| | **विद्युत व यांत्रिकी कामे** | | |
| १ | पंपींग मशिनरी | --- | ४६,२६,५६८ |
| २ | एकूण भाग१ + भाग२ | --- | २,६२,००,३०१ |
| ३ | अनुषंगिक खर्च २५.२५ टक्के | --- | ६६,१५,५७६ |
| | प्रकल्पाची एकूण किंमत रुपये (वॅट सहित) (१+२+३) | | ३,२८,१५,८७७ |
| | **प्रतिहेक्टरी किंमत** | | ८६५४५ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ३७१.३३ हेक्टर |
| लाभव्यय प्रमाण | १.६८ > १.१० |
| वॅट किंमत | रूपये ६,७९,०१९ |
| वॅट वगळून एकूण किंमत | रूपये ३,२१,३६,८५८ |
| प्रति हेक्टरी किंमत | ८६,५४५ < ८६,८०० |

A:\476.doc